# दारूपासून अनर्थ



हा ग्रंथ.

भवानी विश्वनाथ

यांनीं

तयार केला.

मुकाम मुंबई

ज्ञानदर्पण छापखान्यांत छापिला.

सन १८५२ शाके १७७५





तारीख ४ थी माहे सप्टेंबर सन १८५२ च्या प्रभाकरां त कित्येक मुलांनी "सत्योपदेशग्राहक" अशी सही घालून एक पत्र छापविलें आहे व त्यावर प्रभाकराच्या रूज्ञ कर्त्यानें आपलें मत दिलें आहे कीं, भवानी विश्वनाथ यानें. मद्यपान करावें असें मत दिलें हें त्यास अयोग्य होय आणखी त्याप-त्रांत मी केवळ मद्य देवतेचा भक्त आहें असें दर्शविलें आहे व प्रभाकर कर्त्यांनीं त्यावर आपलें अनुमत देतानां बरेंच त-र्कशास्त्र लढविलें आहे; हें पाहून एका विद्वान गृहस्थानें बंबे ग्याझेट् व टेलिग्राफ पत्रांत प्रभाकरांतील सदई मजकुराचें भाषांतर करून छापविलें, ह्मणून मी त्याचे फार आभार मानितों. असो, असें करण्यांत या गृहस्थाचा उद्देश हाच कीं, माझ्या अ ब्रूस बट्टा लागावा; परंतु मी प्रभाकरांत छापल्याप्रमाणें बोल-लोंच नव्हतों ह्मणून मी आपल्या नावानिशीं ग्याझेट पत्रांत जा-बदिला, तथापि प्रभाकर कर्त्यांनीं आपला क्रम सोडला नाहीं.

श्लोक.

वा प्रभाकरा, सोडि मत्सरा,
चाल नीतिनें, आलिसे जरा;
सांग तों तुला, मार्ग हा खरा,
जोडुनी आतां दोनही करां. १

असो, एवढें जरी मी केलें तरी कित्येक भोळ्या लोकांचे मनांतून, मजविषयीं जें प्रभाकरानें भरविलें आहे तें गेलें नाहीं. ही वदंता ऐकून माझें रास्त मत काय आहे हें कळावें या हेतूनें मी हा लहानसा ग्रंथ रचून विद्वज्जनसमाजापुढें ठेवावा असा निश्चय केला आहे. तर सुज्ञांहीं यांतील दोषांकडे लक्ष न देतां गुणग्रहण करावें, असी माझी त्यांस विनंती आहे.

आमचे विद्वान लोक, जे दुसऱ्यांस ब्रह्मज्ञान सांगतात की, तुह्मी आपल्या मुलांस सुशिक्षा द्या; व स्वतः तसें करीत नाहींत, त्यांविषयीं, व हिंदूंचे मुलांस कोणत्या प्रकारची विद्या प्रथमतः द्यावी याविषयीं मी हल्लीं एक पुस्तक लिहित आहे तें हि लवकरच लोकांनीं मदत केल्यास छापून प्रसिद्ध करीन.

मुंबई; ता० १ अकटंबर १८५३ भवानी विश्वनाथ

# दारूपासून अनर्थ.



येथें जितका विद्येचा विस्तार होत चालला आहे त्याच्या पेक्षां शतपट किंबहुना सहस्त्रपट अधिक दारूचा विस्तार होत आहे. या दारूनें अविद्वानांस व कित्येक विद्वानांस देखील नाडून टाकलें आहे. तर यापासून आपलें हित किंवा अनहित होतें यांविषयीं आपणास अवश्य विचार केला पाहिजे.— या मुंबई शहरांतच दारूचे अनेक प्रकार आहेत; परंतु त्यांतून प्रसिद्ध जे त्यांची नावें. शेरी, चामपेन, क्लेरट, पोर्टवैन, इत्यादि आहेत. कित्येक असें ह्मणतात कीं, दारूपासून मनुष्यास फार अंमल चढत नाहीं; परंतु यापासून अगदींच अंमल येत नाहीं, असें कबूल करीत नाहींत. गरीब लोकांस हीं मद्यें प्यावयास मिळणें कठीण; कांकीं, यांची किंमत फार आहे, तर गरीब लोक ज्या दारू वापितात, त्यांची नावें- बेवडा, ब्रांडी, बीयर, ताडी, इत्यादि. या दारूंपासून त्यांस फारच कैफ चढतो व शेवटीं छाकटे होऊन गटारांत प-

डतात, व नाना तऱ्हेचे त्यांचे हाल होतात त्याचे विवरण पुढे केलें आहे.

दारू पिण्याची चट हिंदु लोकांस इंग्रेज लोकांपासून फार च लागली आहे. आमचे कित्येक लोक असें ह्मणतात कीं, इंग्रेज लोक एवढे सुधारलेले असतां मद्य प्राशन करितात. तर आह्मी कां करूं नये? मित्रहो, आपण या लोकांचे गुणच घ्यावे. दोष घेऊं नये; चांगला मनुष्य झाला ह्मणून त्याचे सर्व च गुण चांगले असतात असें नाहीं, किंवा चांगल्या मनुष्यानें वाईट कर्म केलें ह्मणून त्यास वाईट ह्मणूं नये, असें नाहीं. ही जरीं बहुधा लोकांत चाल पडली आहे कीं, एकदां चांगला ह्मटला ह्मणजे जरी त्याचे कांहीं झालें, तरी तें चांगलेंच; तर ही अगदीं खोटीं चाल आहे. तिचा त्याग करण्याविषयीं आपण झटावें हें योग्य आहे. कर्नल सैक्सासारिखे कित्येक लोकांचें ह्मणणें असें आहे कीं दारू इंग्रेज लोकांसहि या हिंदुस्थानांत अनहितकारक आहे व सेनेंतील शिपायांस जे रोग उत्पन्न होतात ते सर्व दारूनेंच होतात असें त्याचें ह्मणणें आहे. "कलकत्तारिव्ह्यू" ह्मणून कलकत्यांत दर तीन महिन्यास एक पुस्तक नि-

र्नल असतें त्या पुस्तकाच्या १८५१ च्या सप्तेंबर महिन्याच्या अंकांत असें लिहिलें आहे कीं. वाटर्लूची जी मोठी लढाई झाली त्या लढाईंत जितके इंग्रेज मेले त्यांच्या तिप्पट दरसाल बंगाल येथील सैन्यांतील शिपाई दारूपासून मरतात. तरी हें दुष्टव्यसन अजून यांस सुटत नाहीं. अहो दारूबाज हो! तुह्मी ह्मणतां कीं. इंग्रेज लोक सुधारलेले व विद्वान असून दारू पितात तर यापासून कांही अनहित नाहीं. ही केवळ तुमची वेडी समजूत आहे. ह्या इंग्रेजांतून कित्येक आपले ज्ञानचक्षु उघडून विचार करित आहेत कीं. दारू ह्मणजे मृत्यूचें घर आहे. व या पासून दूर होण्यास ते प्रयत्न करीत आहेत. यानीं "टेंपरान्स सोसैटी" ह्मणून एक सभा काढली आहे व तींतील जे सभासद होतील त्यांनीं कधींहि औषधाविना दारू प्राशन करूं नयें असा ठराव केला आहे. ज्यांच्या मुळें दारूचा एवढा प्रचार झाला, ते स्वतः ती पासून फार तोटे आहेत असें जाणून तिचा त्याग करूं लागले आहेत. तर तुह्मीं या गोष्टीविषयीं इंग्रेजांचा कित्ता कां घेत नाहीं? आपणास ईश्वरानें मनुष्य

देहास आणलें आहे त्याचा हेतु, आपण दुष्टकर्में करावीं व पाप करावें असा आहे कीं काय? सर्व लोकांचे धर्मांत असें सांगीतलें आहे कीं, ईश्वरी नेमाविरुद्ध आपण कांहीं करूं नये. तर दारू पिणें ईश्वरास संतोषकारक आहे काय? नाहीं:- खचित नाहीं. या दारूपासून तुह्मास इहलोकीं व परलोकीं फार दुःख भोगावें लागेल- दारूबाज हो! अजून सावध व्हा. हा मनुष्यदेह केवळ क्षणभंगुर आहे, ह्मणून या शत्रूच्या पाशांतून सुटून सत्कर्में करूं लागा.

कित्येकांचें ह्मणणें असें आहे कीं, दारू अन्न पचन करिती, शरीर पुष्ट ठेविती, व ती प्राशन केल्यानें कधींहि रोग होत नाहींत व डाकतर देखील थोडी दारू प्यावी ह्मणून सांगतात. जर डाकतर नित्य दारू प्यावी ह्मणून सांगत असले तर हें मोठें नवल आहे. त्यांनीं कदाचित् असें ह्मटलें असेल कीं, दारू औषधांत उपयोगीं पडते. त्यांच्या या ह्मणण्यावरून नित्य दारू प्यावी हें सिध्ध होत नाहीं. कांहीं सोमल, इत्यादि विषकारक पदार्थहि औषधांत उपयो-

गी पडतात असें डाकतर ह्मणतात ह्मणून सोमल इत्यादि विषयुक्त पदार्थ नित्य खावे असें डाकतर ह्मणतात, असें कसें ह्मणवेल? मद्यदेवतेचे भक्त असें ह्मणतात कीं, दारूपासून अन्न जिरतें, ही गोष्ट डाकतर लोक अगदीं कबूल करीत नाहींत अन्नापासून जठराग्नीस जी शांति होती, ती या दारूपासून न होतां उलटी जठराग्नीस फार इजा होते. जर आपण नित्य नियमानें अन्न खाऊन दारू पीत गेलों तर तेणेंकरून उद्यांचें मरण आजच येऊन ठेपतें. यास उदाहरण - यार्क शहरांत ज्यान् वाटस् ह्मणून मोठा सज्जन मनुष्य राहत असे तो अठरा वर्षांचा असतांच त्याचा बाप मरण पावला. या प्रसंगीं त्याजवळ पैसा फार होता, ह्मणून मित्रांचा मेळा त्याचे घरीं फार जमत असे. हे मित्र केवळ ख्याली खुशालींत वेळ घालवीत; त्याच्या संगतीनें ज्यान् वाटस् यास दारू पिण्याची चट लागली. यानें, जेवला रे जेवला ह्मणजे वाटल्याच्या वाटल्या दारू आपल्या मित्रांचे समागमें झोकावी. असें होतां होतां वाटसास चारपांच वर्षांनीं क्षयरोग लागला व त्याचें शरीर अगदीं क्षीण होत होत चाललें व एका वर्षानें वाटसास

दारूनें कबर दाखविली. यास दारू प्यावयाची संवय लाग- ण्याचे अगोदर हा शरीरानें "धष्टपुष्टो भवेद्दादा" असा होता व तो ज्यावेळेस मेला त्या वेळेस त्याचें शरीर अगदीं काठीं प्रमाणें झालें. पाहा, दारूचा परिणाम! जे डाकतर ह्मणतात कीं, मद्यपानानें शरीरास पुष्टि येते त्यानीं कृपाकरून आपलें बोलणें सिध्ध करावें. हें सर्व दारूबाजाचें बोलणें असावें! तर हे दारूबाज हो! कृपाकरून कोणाचें शरीर या दारवेपासून निरोगी व पुष्ट झालें आहे हें सांगा. बरें यांच्या ह्मणण्याप्रमाणें क्षणभर कबूल केलें तरी, शरीरास पुष्टी देणारे दुसरे पदार्थ नाहींत कीं काय? गाईचें दूध पिल्यानें पुष्टि काय थोडी येत्ये? रोगी लोक देखील तें पितात व तेणेंकरून त्यांस पुष्टि येते. तर अमृत सोडून विषाचा प्याला तोंडास लावणें हें मूर्खत्व नव्हे कीं काय? आतां, विलायतेंतील मोठमोठे वैद्यांही जें आपलें मत दिलें आहे तें "दारूपिणारांस सुबोध" या नावाच्या पुस्तकांत लिहिलें आहे तें येणें प्रमाणें:—

"दारूनी प्रकृति चांगली होती, व जे नेहेमी मेहेनत करणारे त्यांस दारू अगत्य पाहिजे अशी समजूत, पूर्वी लोक अडाणी

व मूर्ख होते.त्या वेळे पासून पडून गेली आहे व बाळपणापासून ऐकत गेल्यावरून इंग्लिश लोकांची व बहुतेक लोकांची अशीच समजूत झाली आहे.

"शारीरशास्त्र व प्रकृतिविषयकशास्त्र व अनेक समयीं व अनेकदेशीं जें पाहण्यांत आलें आहे त्या अवघ्यांचा चांगला शोध केला असतां वैद्यशास्त्रांत जे निपुण त्यांची अशी खात्री होते कीं, दारूनें प्रकृति चांगली होते वगैरे वर लिहिल्याप्रमाणें जी गैरसमजूत पडली आहे ती अगदीं चुकून पडली. जसें इतर जनावरांस दारू वगैरे नको, तसें, मनुष्याची प्रकृति चांगली नीट असतां तीस दारू वगैरे उत्तेजक पदार्थ कांहींएक नकोत. आणि त्या तसल्या पदार्थांपासून कांहीं गुणहोणार नाहीं, अथवा मनुष्याच्या सर्वआयुष्यांत जोउद्योग व्हावयाचा तो अधिक होणार नाहीं. दारू इत्यादि उत्तेजक पदार्थ कितीहि अल्पमानानें ठेविले.तथापि त्यांच्या योगानें बहुधा उद्योग कमी होईल.

"दुखण्यामुळें अथवा दुसऱ्या कारणामुळें मनुष्याच्या शरीरीं कांहीं एककाळ अशक्तपणा आला असला,तर औष-

धासाररवें कित्येक मद्यांचें सेवन कांहीं काळ पर्यंत उचित आहे; परंतु मनुष्यास बरें होऊन त्याची प्रकृति पूर्ववत् चांगली नीट झाली, ह्मणजे मग त्या मद्यादिकांच्या सेवनापासून कांही एक हित होत नाहीं. तीं फार परिमित मानानें सेवितो; परंतु असें विशेष मानानें सेविलें असतां शरीराची नासाडी होती. दोनदिवस पुढें किंवा दोन दिवस मागें; परंतु शरीरास विकार झाल्यावांचून राहत नाहीं."

यावरील मतावर स्मारें शंभर सह्या आहेत असें तो ग्रंथकार ह्मणतो, तर एवढ्या विद्वानांचें मत रास्त आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, नियमित व थोडी पित्यानें कामकाज करायास सुचतें, व याविषयीं फार दृष्टांत देतात- कित्येक असें ह्मणतात कीं, कोणत्याहे एकाद्या विषयावर लिहिणें झाल्यास दारूच्या लहरीनें जसें कोणी लिहील तसें तो शुध्धीवर असल्यानें लिहूं शकणार नाहीं. काय हो नवल हें! दारूपिण्यानें मनुष्य चांगला विषय लिहूं शकतो! कोणी एकादा वेडा मनुष्य असला तर तो शहाण्यापे-

क्षां चांगला विषय लिहूं शकेल कीं काय? नाहीं; त्याप्रमाणें दारू प्यालेला मनुष्य शुध्ध वेड्या प्रमाणें आहे, तो काय लिहिणार? त्याच्यानें लेखणीहि नीट धरवणार नाहीं तो चांगल्या बाईटांस व सर्वांसहि शिव्या गाळींचा भडिमार करीन स्फटेल. कारण कीं, त्यास जी दारूची तार येते तेणें करून त्यास नीति काय व अनीति काय हेंहि माहित नसतें व आपल्या मनांत आपण केवळ राजा आहें असें मानितो. याप्रसंगीं तो जरीं कोणाचा चाकर असला तरी तो आपल्या धन्याची पर्वा करीत नाहीं, व याप्रसंगीं जें त्याच्या तोंडास येईल तें तो बकत असतो, आणि अशानें त्याचा किती नाश होतो हे या पुढील ओवींत सांगितलें आहे:—

ओवी

ज्यानें दारूचा घोट घेतला॥ तो संसारसुखाशी मुकला॥
अधोगतीं ही पातला॥ दारूचें फळ हेंच पैं॥१॥

दारू प्यालेला मनुष्य कामास अगदीं उपयोगीं पडत नाहीं, या विषयीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील, व तीं अशा लहान-ग्या पुस्तकांत लिहिणें कठीण. म्हणून थोडींशीं चमत्कारिक उ-

दाहरणें येथें लिहिलीं आहेत:—

बडोद्याजवळच्या एका खेड्यांत रामा या नावाचा एक भंडारी राहत असे, तो घरचा सधन होता, ह्मणून एका पंतोजीस ठेवून त्यानें आपली विद्यावृद्धि चालविली. तिकडे आपले हिंदु राजे होते, तेव्हां अर्थातच भूगोल खगोलादि विद्या त्यास शिकण्याची कल्पनाही आली नाहीं. या प्रसंगीं शिकणें ह्मणजे काय तर कारकूनगिरी. आतां राम्याच्या मनांत महाराजांचे दरबारीं चाकरी करावयाची नव्हती; परंतु वस्तुतः कारकूनगिरी असली ह्मणजे, अंधळ्यांत लंगडा राजा. या ह्मणीप्रमाणें अज्ञानी जे त्याचे ज्ञातीचे लोक, कीं ज्यांस श्री काढतां येण्याची भ्रांति, त्यांचें जर कांहीं काम असलें तर त्यांपासून यास कांहीं फायदा होईल. दुसरें असें कीं, त्या काळीं असल्या हलकट लोकांमध्यें कारकुनांस मोठा मानमिळत असे; तर आपणास विद्वान् असें मानून आपल्या जातीचे सर्व लोक आपणास मान देतील. यानें झटून पंचवीस वर्षे पर्यंत कारकूनगिरी चालविली; परंतु "चांगल्या शाहास तवकर कीड लागल्ये." या ह्मणी प्रमाणें त्यास दुष्टमि-

त्यांची संगत लागली; हे मित्र सुरापान करणारे होते. पहि- ल्यानें हा दारूपिण्याविषयीं कांकूंच करूं लागला; परंतु त्याच्यानें मित्रांची मर्जी मोडवेना, ह्मणून थोडें मद्यपान केलें. नंतर "संगती संग दोषेण" याप्रमाणें त्यास त्यामि- त्रांच्या सहवासानें मद्याची चट लागत चालली व त्याचें ल क्ष लिहिण्यावरून उडत उडत चाललें व त्या दारुड्यांच्या सोबतीनें तो फिरूं लागला व दारूच्या दुकानीं हरहमेश तो जाऊन बसूं लागला. पुढें त्याची मद्यमय प्राण, अशी ग त होत चालली. एके प्रसंगीं त्याचे जातींत शेता बद्दल कां- हीं तटा पडला, तेव्हां असे ठरलें कीं, करारपत्र करावें. रा- म्या या प्रसंगीं बराच झिंगलेला होता, त्यास सर्वांनीं जाऊ नआणून कागद व लेखणी देऊन, ह्मटलें, तूं करारपत्र लिहि, असें सांगीतलें असतां राम्याच्यानें करारपत्र लि- हवलें नाहीं. तो ह्मणाला, "मला जरासी दारू द्या" "अडले ला वैद्य गाढवाचे पाय धरी" याप्रमाणें ते लोक अडले हो ते ह्मणून, त्यास दारू आणून दिली. राम्यानें दारू प्यायल्या नंतर कांहीं वेळा उपरांत हातांत कागद व लेखणी घेऊन लि-

हूं लागला. जेथें धनकोचें नांव लिहावयाचें तेथें त्यानें ऋण कोचें नांव लिहिलें व करारपत्रावर सह्या घालायाचे जागीं त्यांच्या सह्या आपणच घालून त्याचे खालीं "मद्दात्तद्दा भविष्यति" असें लिहिलें. बरें, लिहिल्यानंतर तें करारपत्र वाचूं लागला, तों जीभ बोबडी वळली. करारपत्र ह्मणायाचे ठिकाणीं "क क क लाल पत्तर" असे शब्द निघूं लागले, आणि हेहि शब्द निघण्यास पावलासाचा विलंब लागला तेव्हां कोणी त्यास ह्मटलें "दादा, तुह्मी नेहेमी लवकर वाचतां आणि येथें आज हो काय असें?" तर त्यास गालिप्रदान करी. सारांश, त्याच्यानें शेवटीं तो खर्डा वाचवला नाहीं. नंतर एका ब्राह्मणास बोलावून तो खर्डा वाचविला, तर त्या खतांत सर्व अर्थाचा अनर्थ केला आहे. पाहा! हा राम्या पहिल्याने या कामांत हुशार होता तोच या दुष्टव्यसनाच्या नादीं लागून अगदीं कामांतून गेला.

ओवी

राम्या वेडे दारूनें केलें॥ त्याचें जिणेंविषमूकलें॥
पशूंमध्येंसाशींगणिलें॥ सर्वस्त्रीत्याच्या ज्ञातीनें॥१

आत्तां, वर हिंदूचें उदाहरण दिलें आहे, यावरून कित्येक

असें समजतील कीं. दारूपासून हिंदूसच बाध होतो; परंतु ही त्यांची वेडी समजूत होय. दारूस हिंदु काय, पारशी काय, मुसलमान काय, व इंग्रेज काय, ती बाधा केल्याविना राहावयाचीच नाहीं. आतां यांत एवढाच भेद कीं, हिंदू लोक इतरांपेक्षां फार अशक्त पडले ह्मणून त्यांस अधिक बाधा होते. आतां इंग्रेज ह्मणजे हिंदूपेक्षां फार बलाढ्य आणि निरोगी असतात ह्मणून दारूपासून इजा भोगूं लागण्यास त्यांस हिंदूपेक्षां जरासा विलंब लागेल; परंतु इंग्रेजांस इजा होणार नाहीं. अशी गोष्ट कधींहि संभवणार नाहीं. इंग्लिश लोकांस याची इजा होते. याविषयीं पुष्कळ उदाहरणें आहेत त्यांतून एक दाखवितों-

ग्लासगो ह्मणून स्काटलंडांत एक शहर आहे, तेथें सन १८२३ सांत गील मोर ह्मणून एक व्यापारी राहत असे; त्यास जेम्स् आणि ज्यान् ह्मणून दोन मुलगे होते. हा महाश्रीमान् असे ह्मणून याचे मनांतील उद्देश असा होता कीं, आपल्या मुलांस विद्येंत प्रवीण करण्याकरितां जरी लाखों रुपये पडले तरी तितके खर्च करून यांस विद्वान् करावें. जेम्साचें वय १५

वज्यानाचें वय १२ वर्षाचें होतें. या दोघां मुलांसहि बापानें ग्लास्‌गो शहरांतील विद्यालयांत शिकावयास पाठविलें. या दोघां मुलांसून जेम्साची बुध्दि मोठी चपळ होती ह्मणून तो लवकर शिकत चालला व ज्यान्‌ जरासा जड्‌बुद्धीचा होता. शिकतां शिकतां जेम्स पहिल्या वर्गापर्यंत आला, आणि इतक्यांत त्यास दुर्बुध्दि सुचून शिकण्यावर त्याचें लक्ष बसेनासें झालें व त्याचे मनांत वारंवार असें येई कीं, आपलें तारुण्यवय आहे, कांहीं तरी चैनबाजी करावी असें मनांत येतांच तो वाईट मुलांच्या संगतीनें फिरून वेश्याव्यसनांत, धूम्रपान (गुडगुडी ओढणे) इत्यादि करूं लागला; परंतु कांहीं वेळ पर्यंत, दारूपासून फार अनर्थ होतील हें जाणून व कांहीं बापाच्या धाकामुळें त्यानें दारूस अगदीं स्पर्श केला नाहीं. त्याचे मित्र त्यास अत्यंत आग्रह करूं लागले, ह्मणून त्यानें प्रथमतः दारूचा लाहानसा घोट घेतला, व ती त्यास गोड लागली, ह्मणून तो वारंवार जास्ती घेत चालला, असें होतां होतां त्यास एक एक बाटली थोडीच होत चालली. इकडे ज्यान्‌ जो ढ होता त्यानें बरीच विद्या-

संपादन केली; परंतु आपल्या भावाचे बरोबरीस त्याच्यानें ये वचलें नाही. पुढें कांहीं कांदिवसांनीं त्याच्या बापास क्षयरोग लागून तो अगदीं मरायास टेंकला. मरतेवेळीं त्यानें जेम्सयास आपले बिछान्याजवळ बोलावून नेऊन ह्मटलें, "मुला, तूं विद्या बरीच केली आहेस; परंतु तुला व्यसन फार लागलें आहे, तर या व्यसनानें तुझा फार नाश होईल. तरतें सर्व सोड. आतां मी परलोकास जात आहें. तर ज्यानाच्या तूं संभाळ कर, व व्यापार नीट रीतीनें चालीव. हेच माझे शेवटचे शब्द." हा उपदेश ऐकून जेम्साच्या डोळ्यांतून टिपें पडूं लागलीं, कांकीं, तो त्यावेळीं शुद्धीवर होता, व आपले बापास, मरतानां असी थापदिली कीं, आजपासून मी कधीं दारूचा घोटहि घेणार नाहीं; परंतु त्यानें याप्रमाणें आचरण केलें कीं काय? नाहीं; ज्यादिवशीं बाप मेला, त्याच दिवसापासून तो बिनधास्तपणें अधिकच सुरापान करूं लागला. नंतर लवकरच बापाचा व्यापार त्याचे माथीं पडला. तेव्हां कागदपत्र लिहिणारा काय तो जेम्स, कांकीं, ज्याकस बापाच्या खटल्याविषयीं जेम्सा इतकी माहिती नव्हती. जेम्स हा फीसांव जावयाच्या अगोदर दारू पिऊन तयार होत असे. हकी-

सांत गेलारे गेला ह्मणजे खुर्चीवर बसून टेबलावर पाय टाका वे व सर्वदा दारूच्या गुंगींतच असावें. येणेंकरून व्यापाराचें काम जशाचें तसेंच राहून तोटा येऊं लागला. कारकून जेव्हां याजकडे सही घेण्यास येत, तेव्हां त्याच्यानें कागदावर सही देखील करवत नसे. यास मालाची याद देखील करतां यावयाची पंचाईत होत चालली. तो खर्चाचे ठिकाणीं पैसा मांडी व जमेच्या ठिकाणीं शून्य मांडीत असे. असें होतां होतां शेवटीं त्याचे भामीदारांनीं त्याचा सर्व पैसा खाऊन त्यास मोठा रस्ता खुला आहे, असें सांगितलें. पाहा, हा दारूचा परिणाम! दारू इंग्रेजांस व हिंदूस काय, नडल्यावांचून कदापि राहणार नाहीं.

## अभंग.

लोक ह्मणती दारूच्यावी॥ दुःखें कैशी हो भोगावी? १
दारू पितां शिहिनां येतें॥ ऐसें कैसें संभवतें?॥ २॥
दारू पितां मूर्ख होती॥ यासि दाखले हो किती॥ ३॥
मुलां नावडे हो देवा॥ त्यावर विश्वास ठेवावा॥ ४॥
दारू पित्या बुद्धिहीन॥ होती जाणा सर्वजन॥ ५॥

सुरापान जाणीं केलें॥ त्याचें सर्वस्वही गेलें॥६॥
मद्य पिल्यां देह क्षीण॥ ह्मायान लागे हो क्षण ७
दास ह्मणे सावधानें॥ सोडा घोर मद्यपानें॥ ८॥

कित्येक दिवसांवर एक मित्र असें ह्मणाला कीं, कोणी एक पत्रकर्ता दारू पिऊन आपल्या पत्राकरितां बातमी लिहित होता. ही गोष्ट त्यानें पाहिलेली नव्हती. मी त्यास विचारलें कीं, असें संभवेल तरी कसें! जो मनुष्य मदोन्मत्त त्या मनुष्यास आपल्या पत्राकरितां बातमी लिहिण्याचें धोरण कशाचें! तो ह्मणाला कीं, तो पत्रकर्ता सर्वदा शुद्धीवर असतो असें नाहीं. मी त्यास सांगीतलें, बाबा असेंच, जे जे लोक या दुर्व्यसनांत पडले आहेत त्या सर्वांची हीच दशा. हीं वरजीं उदाहरणें दिलीं आहेत, यावरून व दुसऱ्या सहस्रावधि उदाहरणांवरून असें सिद्ध होतें कीं, दारू पिल्यानें चांगलें लिहितां येतें असें ह्मणणें केवळ अप्रयोजक आहे.

आतां कित्येक असें ह्मणतात कीं, वरजीं दुःखें लिहिलीं, तीं सर्व अधिक दारू प्यायली तर होतील; परंतु दररोज मितपणानें थोडी दारू प्यायली तर तिजपासून कांहीं बाधा हो-

वयाची नाहीं. ज्या अन्नेंकरून हा मनुष्यदेह चालत आहे तें अन्न जर आपण अतिशय खाल्लें, तर त्यापासूनहि अजीर्णादि बहुत व्याधि उत्पन्न होतात. मग दारूची तर काय कथा? परंतु हें जर अन्न नियमितपणानें खाल्लें तर आपलें शरीर कसें तेजःपुंज व निरोगी रहातें? येणेंकरून आपणास रोग बहुधा होत नाहीं. त्याप्रमाणेंच आज एक पावशेरच दारू प्यायली, तर कधींहि अधिक पिऊं नये ह्मणजे आपलें शरीर चांगलें राहून बुद्धीस देखील चपलता येईल. सारांश. या लोकांचें ह्मणणें हेंच कीं, अधिक दारू पिण्यानें नाश होईल; परंतु थोड्याशा दारूनें नाश कदापि व्हावयाचा नाहीं. यांस जर असें ह्मटलें कीं, थोडी दारू पितां अधिक अधिकप्याबीशी वाटते तर ते असें ह्मणतात कीं. थोडें अन्न खात असतां त्यास अधिकाची आशा कां प्राप्त होत नाहीं? व असे जर सर्व लोक अधिक अधिक अन्न खाते तर सर्व जग मरून गेलें असतें. तर अन्नाच्या उदाहरणांत असें कां घडत नाहीं? हें बोलणें जरासें अवघड आहे, तथापि यास जाबदेणें फार कठीण असें नाहीं. परमदयाळू व त्रैलोक्य उत्प

न्न करणाऱ्या प्रभूनें मनुष्याचे पोटांत क्षुधा उत्पन्न केली, तिचें शांतवन करण्याकरितां अन्न हा पदार्थ अवश्य पाहिजे. व हें अन्न एकदां पोट भरून खाल्लें ह्मणजे जठराग्नि थंड होतो, आणि तेणेंकरून आपले इंद्रियांस बळकटपणा प्राप्त होतो. हें जर अन्न आपण एक दिवस न खाल्लें तर आपली दशा काय होईल? हें सांगावयासच नको. आपले हात पाय चालणार नाहींत; परंतु तशी दारूची गत आहे कीं काय? नाहीं. जे लोक दारू पीत नाहींत त्यांची दशा वाईट आहे काय? जे दारू पीत नाहींत, ते मरून गेले काय? नाहीं. तरही दारू, इंद्रियें चालविण्याकरितां पाहिजे असें जें ह्मणणें तें केवळ खोटें आहे. अणखी दुसरें हें कीं, अतिशय दारू प्यायली तर तिजपासून कदाचित् मनुष्य मरण पावेल; परंतु अतिशय अन्न खाल्ल्यामुळें कोणी मेलें असें उदाहरण फारच क्वचित् सांपडेल. पोटभर अन्न खाल्ल्यानें मनुष्य मरण पावला आहे असें, दारूच्या तर्फेनें बोलणारे लोकहो! कृपाकरून दाखवा. अन्न खाण्याची व दारू पिण्याची जेव्हां तुह्मी तुलना करितां तेव्हां तुह्मी विचार करण्यांत चुकतां; तें असें कीं,

तुह्मी अन्न पोट भरून खाल्ल्याची कल्पना करितां आणि दारू थोडी घेतल्याची कल्पना करितां. तर पोट भरून खाणें आणि थोड क्यांत, किती बरें अंतर आहे? या दोहोंत जमीन अस्मानाचा फरक आहे, असें ह्मटल्यास चिंता नाहीं. अन्न जर पोट भरल्यावर खाल्लें, तर तें अधिक होऊन त्यापासून वाईट परिणाम होतात; परंतु दारू थोडी घेतली असतांहि किती भयंकर परिणाम होतात? बरें, अशी कल्पना करा कीं, कोणी मनुष्य कलालाच्या दुकानीं जाऊन दररोज अर्धे ग्लास दारू पितो, तर या पिण्यापासून त्यास कांहीं बाधा होणार नाहीं कीं काय? खचितच होईल. एकदां अंमल चढला ह्मणजे तो मनुष्य रस्त्यावर पशुवत् लोळूं लागतो व बडबडहि करूं लागतो. मोठ मोठे लोक ह्मणतात कीं, दारूपेक्षां भांग अंमलांत फार कमी आहे. असें असतांहि जर एक लहानशी लोटी भांग प्यायली तरतो पिणारा मूर्खाप्रमाणें हंसतो व बडबड करितो असें आपण डोळ्यांसमोर निखश: पाहतों मग दारूचा तर काय रंग?

## आर्या.

मद्यप्राशन न करा. ऐसें वेदादि सर्व वदती हो ॥
परि हे मूर्खचि अवघे, मद्य दुकानीं प्रमत्त लोळतिहो

असा सद्गुण लागण्यास फार विलंब लागतो, तसा दुर्गुण लागण्यास अवकाश लागत नाहीं. आतां अशी कल्पना कराकीं, कोणाच्या शरीरप्रकृतीस एक औंस दारू अगदीं बाधा करीत नाहीं, तेव्हां नितकी घेण्यास काय चिंता? तर ही समजूत अगदीं व्यर्थ; कांकीं, जरी आपणास बाधा होते हें बाह्यात्कारी समजत नाहीं; तरी अंतर्यामीं कांहीं इजा होतच असती, आणि हा मनुष्य नित्य एकच औंस पिऊन असेल कशावरून? मद्याचा एकदां स्वाद लागला, ह्मणजे नियमितपणा राहील हें आमच्यानें ह्मणवत नाहीं. मद्य हा एक मोहकारक पदार्थ आहे. त्याच्या एका बिंदूचा एकदां स्वीकार केला, ह्मणजे पिणारास असा मोह उत्पन्न होतो, कीं दुसरा बिंदु घ्यावा, आणि त्याप्रमाणें तृषा नेहेमी वाढत जाते, व घेणारा कितीहि मोठा शाहाणा मनुष्य असला तरी, त्याच्या मनास कांहींअटकाव होत नाहीं. त्यास असें वाटतें कीं, सर्व ब्रह्म मद्यपिण्यां

त भरलें आहे. भूमिति, बीजगणित व दुसरे जे रमणीयविष य,ते त्यांस या मद्यापुढें कांहींच वाटत नाहींत. कित्येक गोष्टीं विषयीं आपल्या इंद्रियांचें दमन करणारे असें जे लोक आहेत त्यांपैकीं बहुतेक या दुष्ट शत्रूच्या (मद्याच्या) स्वाधीन झाले नाहींत असें नाहीं. याविषयीं उदाहरणें दररोज पुष्कळ आढळतील, व बहुतेकांस माहितहि असतील. मी येथें एक उदाहरण देतों त्यावरून या पदार्थाची योग्यता कळून येईल.

डब्लीन् येथील एका मनुष्यानें असा निश्चय केला कीं, दररोज एक ग्लास दारू घरापासून अर्ध कोशावर जें पिठें आहे तेथें जाऊन प्यावी असा निश्चय करून त्या प्रमाणें त्यानें दोन तीन महिन्यापर्यंत केलें. नंतर त्याच्या मनांत असा विचार आला कीं, दररोज इतकें दूर कशास जावें? त्यावांटची एकदम बाटली भर दारू घरीं आणावयास काय चिंता आहे? मग दुसरे दिवशीं त्यानें त्याप्रमाणें केलें तिसरे दिवशीं त्याप्रमाणें सकाळीं त्याने एक ग्लासभर दारू प्यायली आणि आपल्या खोलींत जाऊन बसला इतक्यांत त्यास असें वाटलें

, अशी ही गोड दारू अगरबी एक ग्लास प्याबी. चौथे दिव-
साची तृषा याहिपेक्षां अधिक वाढली; त्या दिवशीं त्यानें
बारली दारू साफ केली. असें करितां करितां तो पिठे
याच्या बाटल्यांची बरीच खबर घेऊं लागला शेवटीं त्या
त्यामुळे दुर्दशा झाली तर यावरून सहजच दिसून येतें
थोड्या दारूपासूनहि वाईट परिणाम होतात.

अर्क काढलेल्या दारूमध्यें "आलकहोल्" म्हणून मो
विषकारक पदार्थ असतो व ज्या अर्क काढलेल्या नाहीं-
ांमध्यें "कारबानिकॄगास्" इत्यादि प्राणघातक पदार्थ
तात. हे बाधक पदार्थ दिवसानुदिवस आपले शरीरा-
अशक्त करून टाकतात, आणि यमाजीपंताचें बोलावणें
करच येई असें करितात.

## अभंग.

नाश आवडे हो ज्याला॥ घ्यावा दारूचा तें प्याला॥१
मद्यामाजी विष आहे॥ नरा शोधूनी बा पाहे॥ २॥
ज्यानें मद्य प्राशीयेलें॥ त्यानें विषची घेतलें॥ ३॥
दास ह्मणे मद्ययोगें॥ रोग शरीरी होतीजागे॥ ४॥

अधिक व थोडी दारू यापासून जे तोटे होतात त्याविषयीं वरेंच वर सांगितलें. आतां दारूचा अंमल मनुष्यास कसा येतो व त्याचा परिणाम काय होतो याचा विचार करूं. जेव्हां मनुष्य प्रथमतः दारू पितो, तेव्हां त्यास असें वाटतें कीं आपणास यापासून कांहींच इजा व्हावयाची नाहीं; परंतु कांहींका वेळानें त्याचे डोळे लाल होतात, जीभ अगदीं सुकते, तोंडांत थुंका नाहींसा होतो, प्यास लागतो, हातपाय व कधीं कधीं शरीरहि कांपतें. दिव्याची एक जोत असली तर दोन दिसूं लागतात. याचें कारण हेंच कीं, "आलक्होल्" म्हणून जो अर्क काढलेल्या दारूंत पदार्थ आहे तो हळू हळू सर्व आंतड्यास भेदून विषाचा प्रसार करूं लागतो. दारूची तार येत चालली, म्हणजे त्यास असें वाटतें कीं, आपलें पोट अगदीं भरलेलें आहे. मग त्यास मिष्टान्न घातलें तरी त्यास आवडत नाहीं. डाकतर ज्यान्सन् (ज्याचें नांव नवीन इंग्रेजी शिकणाऱ्या बालकांस देखील माहित आहे) तो आपल्या ग्रंथांत असें लिहितो कीं, "दारूबाज आपणास सुख कोठें मिळेल म्हणून शोधूं लागतो; आणि

तें जरी त्याचे पायांशीं असलें, तरी त्यास दिसत नाहीं; त्याची तृप्ति कधीं व्हावयाची नाहीं. तो दारू पिण्याच्या अगोदर मोठा धैर्यवान् असतो; परंतु एकदां त्यानें दारूचा घोट घेतला, म्हणजे त्याचें धैर्य नाहीसें होतें." हें या विद्वान् मनुष्याचें बोलणें रास्त आहे. हें सुज्ञ लोक कबूल करतीलच; कांकीं, या मुंबई शहरांत असलीं उदाहरणें आपल्या डोळ्यां समोर नित्य घडतात. बरें, जोरावरीनें तो जर जेवला तर तें ओकून पडतें, व त्याचे पंचहि प्राण व्याकूळ होऊन जातात. नंतर तो, जसा एकाद्या मनुष्यास वायु होतो, किंवा वेड लागतें, त्याप्रमाणें नाना तऱ्हेची बडबड करितो. त्याप्रसंगीं कधींकधीं असें वाटतें कीं, याचा अंतकाळ अगदीं जवळ आला; आणि ही गोष्ट खोटी नाहीं; कारण कीं, त्याच्या पोटांत अन्न नसल्यामुळें, आणि "आल्कहोल्" या विषकारक पदार्थाच्या जोरामुळें मरण पावतात. हे भगवन्! हे भगवन्! या बुद्धिमान् मनुष्याचे कायरे हे हाल!— जे लोक फार दारू पितात त्यांस तर तिचा कैफ चढावास अगदीं विलंब लागत नाहीं. स्पेक्टेटर नामें ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, "तूं जे

णत्याहि मनुष्याशीं बोलत असलास आणि तो दारू पिऊं ला गलातर दोन बाटल्या पिई पर्यंत संभाषण करण्यास चिंता नाहीं; परंतु तिसरी बाटली उचली. ह्मणजे त्याजवळ तूं ब- सूंन कोस; कां कीं, पहिली बाटली दारू पिते वेळेस तो जो मनुष्य होता तो दुसरे बाटलीचे वेळेस नाहीं. त्याचें देहभान अगदीं जातें. असा दारूचा पराक्रम! मग त्या प्रसंगीं जरी राजा त्याजवळ आला, आणि ह्मणाला, अरे तूं कोण आहेस? तरी तो त्यास तुझा बाप आहें, असें ह्मणायास चुकणार नाहीं.— मागें याक शहरांत बंडें उठलीं होतीं, ह्मणून या कोंचा ड्यूक स्वतः फिरत असे. एके दिवशीं सायंकाळीं सात वाजतां तो घोड्यावर बसून फिरत आहे, इतक्यांत एका झाडा- खालीं त्याचा माळी छाकटा होऊन हत्ती प्रमाणें झुलत ब- सला आहे, असें त्यानें पाहिलें. तेव्हां तो ह्मणाला, अरे हे थंडीचे दिवस आहेत, आणि तूं रात्रीचा येथें कां बसलास? घरीं कां जात नाहींस ते सांग?

छाकट्या— तू तू तू तु कोण आआहेस रे?

ड्यूक— मी या शहराचा ड्यूक आहें.

छाक०— मीमी ड्यूकाचा बाबाबाबा बापआहे.

ड्यूक— अरे! तूं तोंड संभाळ; नाहीं तर तुला येथेंच शिक्षा करीन.

छाक०— जाजाजा गाढवा. मीमीमी तुतुतु तुझ्या तोंडांत मामामारीन.

ड्यूक— अरे! तूं नीट बोल; नाहीं तर तुझें यथायोग्य शासन करीन.

छाकटा— तुतुतु तू मला शिशिशिक्षा करणार. (असें बोलून उठून येत आहे, इतक्यांत खालीं अचेष्ट पडला.) नंतर ड्यूकानें आपले बरोबरच्या शिपाया करवीं दवाखान्यांत नेलें; व काहीं औषध पाजून त्याची दारू उतरविली. दुसरे दिवशीं त्यास बोलावून ड्यूकानें पुसलें कीं, काल तूं दारू प्यायली होतीस काय? तेव्हां तो कांकूं करून ह्मणाला, " साहेब! मी काल दारू प्यायली होती खरी. आतां मला क्षमा करा." ड्यूकानें पुनः त्यास विचारलें कीं, तूं काल माझा बाप झाला होतास, आणि आज क्षमा मागतोस, ही कोणत्या गांवची चाल. हे शब्द ऐकून तो मालीं तटस्थ उभा राहिला.

आणि कांहीं वेळानें ह्मणाला, "महाराज, मी असें कसें बो लेन." हे शब्द जेव्हां ड्यूकानें ऐकिले, तेव्हां बरोबर जो शि पाई नेला होता त्यास खोलींतून हाक मारून त्याकरवीं सर्व हकीकत त्यास सांगितली. ती ऐकून तो ह्मणाला, "महाराज, त्यावेळेस मी अगदीं शुद्धीवर नव्हतों," व जें तुह्मास मी त्या वेळेस बोललों असेन त्याविषयीं मला क्षमा असावी; मी केवळ तुमचें लेंकरूं आहें." ड्यूकास त्या बोलण्यानें कळ वळा येऊन तो ह्मणाला, "जा आतां, तुह्मी मी क्षमा करितों. परंतु तूं इतउत्तरें असें करूं नको हो."— ही तर गोष्ट काय; पण दारूच्या योगानें इतका बेशुद्ध मनुष्य होतो कीं, त्याप्र संगीं त्याचे शरीराचा एक अवयवजरी कापून टाकला तरी त्यास कांहींच समजणार नाहीं. याविषयीं मिस्तर आटरसा हेबानें हें पुढील उदाहरण आपले पुस्तकांत लिहिलें आहे.

"एक सेलर एके दिवशीं दारू पिऊन घरीं आला, आ- णि बायकोचे कांहीं दुर्गुण पाहून तिच्याशीं कज्या करूं ला- गला, व आपल्या खिशांतील सुरी काढून आपलीं दोनहि बोटें कापिलीं; व बायकोस मारावयास धांवला. ती त्व-

रा करून शेजाऱ्याचे घरीं गेली. इकडे एका शेजाऱ्यानें येऊनत्या
ऱ्या हातची सुरी मोठ्या जोरानें ओढून घेतली, आणि त्याच्या
बोटास फडका बांधून तेथें जवळच एक बिछाना होता, त्याव
र त्यास निजविलें. दुसरे दिवशीं सकाळीं तो जेव्हां उठला,
तेव्हां त्याची दारू अगदीं उतरली, आणि डोळे उघडून पाहतो तों
त्याचीं बोटें कापलेलीं आहेत. असें त्यानें पाहिलयावर, आपलीं
बोटें कोणी कापलीं ह्मणून रडून बसला. आणि जेव्हां त्यासअ-
सें समजलें कीं, दारूचे अंमलांत त्यानेंच हें स्वत: काम केलें, ते-
व्हां त्यास जो खेद जाहला, त्याचें वर्णन कोणाच्यानें करवेल? या
प्रमाणें दारूपासून मनुष्याची गत होते. दारूबाज आपल्या हा-
तानें आपलें आयुष्य कमी करून घेतात. हर! हर! हर!

आतां दारूपासून, मनुष्याच्या पैशाचा, पतीचा, व शरीरा-
चा किती नाश होतो, याकडे लक्ष द्या. दारूचा दर फार आहे,
ह्मणून कोणीहि गरीब मनुष्य प्रथमत: थोडीच दारू पितो, नंतर
चट लागली, ह्मणजे त्यास असें वाटतें कीं, आपणास वारंवार म
नुष्यदेह यावयाचा नाहीं, ह्मणून जेव्हढीं ऐहिक सुखें, (ह्मणजे
त्याच्या दृष्टीनें) रंडीबाजी, जुगार, मद्यपान व भांग इत्यादि भो-

गून येववतील तितकीं भोगून घ्यावीं. आपण आज आहों, उ- द्यां नाहीं. वाहवा! काय हो वेडे लोक हे! यानीं जो विचार करा- याचा तो न करितां, उलटा विचार करून आपणांस नाशास पा- त्र केलें. नर्ककूपांत जाऊन पडणें त्यांस कसें आवडतें तें नक ळे. मित्र हो! हा मनुष्यदेह प्राप्त होऊन तुह्मी असले विचार क रावे: कीं काय? या देहीं तुह्मास बुद्धि ह्मणून एक मोठी मोल्य वान् चीज, अगाध लीला करणाऱ्या प्रभूनें दिली आहे, ती तु ह्मास या देहाखेरीज कधीं मिळणार नाहीं. तर कांहीं तरी मो- क्ष प्राप्तीचें साधन करा. असे पशुतुल्य होऊन नरकांत बुड्या मारूं नका. याविषयीं, कबीर या नावाचा एक यवनांतला साधु हो- ऊन गेला तो असें ह्मणतो:—

## पद.

दारूबाजी मत करयासे॥ अक्कल गुंग हि होती॥

आपने पदरका शाम खरच कर॥ मुंमें मती पडती॥१॥

वेदे हुशार रेहेना बे॥ साहेब सच्चा केहना बे॥ ध्रु०

याप्रमाणें मद्यापासून अनर्थ होत आहेत असें असतां या मुंबापुरांत व बहुधा सर्व इंग्रेजी राज्यांत फार दारूचा प्रसार हो-

त चालला आहे ही गोष्ट दुःखाची होय. मागें पेशवाईत व मोंगलाईत जरी सर्व कारभार बेबंद चालला होता असें हिंदुस्थानाचे इतिहासकर्ते एल्फिन्स्तन्, क्यांबेल्, ग्यांड्डफ् लिहितात तरी दारूचा प्रसार त्यावेळेस फार नव्हता. त्या राज्यांत, हल्लीं जसा विद्येचा प्रसार झाला आहे तसा नव्हता. लोक केवळ फार अज्ञानांत होते. त्यावेळीं गोदी व टंकसाळया मधील मोठमोठीं यंत्रें कीं, जी पाहिलीं असतां कित्येक वृद्ध लोकांस ही मनुष्यकृति नव्हे असा भास होतो; तीं नव्हतीं ज्या आगबोटीस वादळाचें देखील भय नाहीं व बाराहि मास सहस्त्रावधि मणांचे ओझें घेऊन सहस्त्रावधि कोश लवकर येतेजाते, तिचें तर स्वप्नहि पडलें नव्हतें. तर मग आगीच्या गाडीची वार्ता कशास! या इंग्रेजी राज्यापासून शाळा झाल्या, त्या शाळांपासून ज्ञानप्रसारकसभा, स्टूडेंटस् लिटररी ॲंड् सायंटिफिक् सोसाइटी, स्टूडेंटस् आसोशिएशन्, इत्यादि सभा निघाल्या. नेटीव जनरल लैब्ररी व नेटीव बुक्क्लब इत्यादि पुस्तकालयें स्थापित आहेत. आलिकडे दोनतीन मराठी वर्तमानपत्रेंहि निघूं लागलीं. येणेंकरून विद्येचा प्रसार अधिक

होत चालला. विद्येच्या योगानें लोक आतां आपल्या अज्ञान दशेंतून जागृत होऊन उद्योगाच्या सहाय्यानें लक्ष्मीच्या पाठीस लागण्याच्या बेतांत आहेत. पुण्यांत शिल्पशाळा निघाली, धारवाडांत पुस्तकालय स्थापित झालें, जिकडे तिकडे लोक स्त्रीशिक्षणाविषयीं झटतआहेत. सारांश, उत्तरोत्तर विद्येची फार वृद्धि होत चालली आहे. अणखी कांहीं दिवसानीं अशीच वृद्धि चालली तर विलक्षण चमत्कार होईल; परंतु ही एक गोष्ट दुःखाची आहे कीं, विद्याप्रमाणें दुर्गुणहि, दिवसेंदिवस फार वाढत चालले आहेत. पेशवाईंत व मोंगलाईंत जर कोणी दारू प्यायला तर मोठें शासन होत असे. व दारूचीं दुकानें फार नसत, किंबहुना अगदींच नसत असें म्हटल्यास चिंता नाहीं. परंतु या सरकारच्या राज्यांत दारूचा अनर्थ फार वाढला आहे. वर्तमानपत्रद्वारें असी बातमी लागली आहे कीं, पुण्यामध्यें मद्यपान फार चाललें आहे. हा शत्रु एवढा प्रबळ झाला आहे कीं, त्यानें कुळंबी, सुतार, इत्यादिकामध्येंच आपला अंमल बसविला आहे असें नाहीं, परंतु सर्वांहून श्रेष्ठ जे ब्राह्मण, त्यांमधूनहि

कित्येकांस (ज्यांस शाक्त ह्मणतात) आक्रांत करून सोडलें आहे. ही मोठी दुःखकारक गोष्ट आहे. शास्त्राप्रमाणें ह्मटलें ह्मणजे शाक्त लोकांस देहांत दंड करावा; परंतु विचारतां काय? "यथा राजा तथा प्रजा." या मताबाबद पुण्यांत मोठमोठीं ग्रामण्यें झाली, व अजूनहि चालली आहेत; परंतु अजून कांहीं बंदोबस्त होत नाहीं. तर यानीं दारूपासून किती अनर्थ होतात, याकडे लक्ष द्यावें. ह्मशत्रु मुंबईंत कित्येक उंचजातींत पसरत आहे, असा बोलावा आहे. ही बातमी खरी असली तर मोठी दुःखकारक आहे, यांत संशय नाहीं. मुंबईंतील दारूचीं दुकानें सरकारानें काढून टाकून अनर्थ कमी करावा, ह्मणून दयाळू मिशनरीहि व वर्तमानदीपिका, ज्ञानोदयादि वर्तमानपत्रांच्या कर्त्यांहीं वारंवार लिहून आजपर्यंत सक्त प्रयत्न करीत आहेत व त्यांत कित्येक वेळ सरकारास याच्या मनाईविषयीं सुचविलें असतें; परंतु आमचें सरकार यांचे योग्य सूचनेकडे अगदीं लक्ष देत नाहीं; "बेबंद राज्य, आणि झोटींग पातशाई" चालली आहे. कांहीं का दिवसां मागें दुसरा एक शत्रु (जुगार) या मुंबईंत फार माजला होता.

त्यानें मनुष्याकरवीं खून, चोऱ्या, इत्यादि पुष्कळ क्रूर कर्में करविलीं; परंतु पोलीसचे माजी माजिस्त्रेट मि० ए. स्पेनस यानीं पुढें सरून या मातलेल्या शत्रूचा पराभव केला. सरकारानें मशारनिल्हे साहेबांचा अर्ज मनावर घेऊन असें ठरविलें कीं, या शत्रूचा ज्या रीतीनें नाश होईल ती रीति योजावी. त्याप्रमाणें शेवटीं एक असें आक्ट काढले कीं, जो या शत्रूचे स्वाधीन होईल त्यास दंड केला जाईल. या आक्टाच्या योगानें या शत्रूचे कांहींसें हात पाय मोडले; परंतु निखालस साफ झाले नाहींत. यांत सरकारचा फारसा अपराध नाहीं. सध्या जो मद्यरूप शत्रूचा जबरदस्त अंमल चालला आहे, तो पहिल्यापेक्षां सहस्रपट जास्ती आहे. तर सरकारानें या शत्रूचा पराभव करण्याकरितां मनावर धरलें पाहिजे. असें ह्मणतानकीं, ही मद्याचीं दुकानें सरकारानें बंद केलीं तर त्यास यापासून वसुलांत फार तोटा येईल; परंतु वसूल प्राप्त होण्याकरितां कांहीं दुसरी युक्ति योजावी. ही दारूचीं दुकानें बंद झालीं, ह्मणजे रयत फार सुखी होईल, व तिचा पैसा जो बाटल्या पिण्यांत जातो, तो कांहीं चांगल्या कार्यांत खर्च होई-

ल, आणि सरकारास खुशीनें कर देऊं लागतील. या शत्रूचा पराभव करण्याकरितां सरकारानें जलदी उपाय योजावा. नाहीं पेक्षां कांहीं दिवसांनीं तो अनिवार्य होईल, आणि शेवटीं आमच्या सरकारास पश्चात्ताप होईल. हें सरकार या शत्रूचा पराभव करण्यास जर न झटलें, तर खरोखर त्याच्या नीतीस, धर्मास, व दयाळूपणास लांछन येईल.

आर्या.

हा ग्रंथ अल्पमतिनें, रचिलासे सेवनीं असो तुमच्या
विद्वज्जन वृंदाशिं, प्रार्थितसें मी निरंतरी आमच्या ॥१



समाप्त.

